विठाबाई नारायणगांवकर पुरस्कारासाठी
पुरस्कार्थीची निवड करण्यासाठी हंगामी
निवड समिती स्थापन करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग,**
**शासन निर्णय क्र. विनापु १७२० (१३)/प्र. क्र. ११९/सां.का.४**
**मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२**
**दिनांक : १४ मार्च, २०२०**

**संदर्भ:** १) शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग क्र. लोलस्प २००४/ प्र.क्र.२७८/ सां.का.३, दि. २४.०३.२००५
२) शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग क्र. विनापु १७१५ (१३)/ प्र.क्र.१०९/ सां.का.४, दि. ०९.११.२०१५
३) शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग क्र. संकीर्ण ८२२०/प्र.क्र. १५/सां.का.४, दिनांक १८ जानेवारी, २०२०
४) संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांचे पत्र क्र. सांकासं/७०१, दिनांक ४ मार्च, २०२०

**प्रस्तावना :-**

उपर्निर्दिष्ट क्र. १ अन्वये, तमाशा क्षेत्रात विठाबाई नारायणगावकर यांनी केलेली प्रदीर्घ सेवा विचारात घेता त्यांच्या नांवे तमाशा क्षेत्रात प्रदीर्घ सेवा केलेल्या ज्येष्ठ कलाकारास जीवन गौरव पुरस्कार देऊन सन्मानित करण्याची योजना शासनातर्फे राबविण्यात येते. उपर्निर्दिष्ट क्र. ३ अन्वये विषयांकित समितीवरील अशासकीय सदस्यांची नियुक्ती रद्द करण्यात आली आहे. त्यामुळे सन २०१९-२० या वित्तीय वर्षाकरिता विषयांकित हंगामी समिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

या शासन निर्णयान्वये तमाशासम्राज्ञी विठाबाई नारायणगांवकर जीवनगौरव पुरस्कार हंगामी निवड समितीच्या स्थापनेस खालील प्रमाणे मान्यता देण्यात येत आहे.

**अ) शासकीय सदस्य**

| | | |
|---|---|---|
| १. | मा. मंत्री, सांस्कृतिक कार्य | अध्यक्ष |
| २. | मा. राज्यमंत्री, सांस्कृतिक कार्य | उपाध्यक्ष |
| ३. | सचिव, पर्यटन व सांस्कृतिक कार्य | सदस्य |
| ४. | संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय | सदस्य सचिव |

**ब) अशासकीय सदस्य**

| | | |
|---|---|---|
| १. | श्री. उल्हास पवार | अशासकीय सदस्य |
| २. | श्री. प्रकाश खांडगे | अशासकीय सदस्य |
| ३. | डॉ. गणेश चंदनशिवे | अशासकीय सदस्य |
| ४. | श्री. खंडूराज गायकवाड | अशासकीय सदस्य |

सदर समिती सन २०१९-२० या वित्तीय वर्षाकरिता विषयांकित पुरस्कारांच्या निवडीसाठी हंगामी स्वरुपात कार्यरत असेल.

२. **<u>प्रवास व बैठक भत्ता</u> :-**

समितीच्या अशासकीय सदस्यांना वित्त विभागाच्या प्रचलित शासन निर्णयानुसार प्रवास भत्ता व बैठक भत्ता अनुज्ञेय राहील.

३. यासाठी संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांना नियंत्रण अधिकारी व लेखाधिकारी आहरण व संवितरण म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. यासाठीचा खर्च हा मागणी क्र. झेडडी-२, मुख्यलेखाशिर्ष २२०५, १०२- कला व संस्कृती यांचे प्रचालन, ०५ कलाक्षेत्रात उल्लेखनीय पारितोषिके, (०५) (०१) अभिनित कलाक्षेत्रात उल्लेखनीय कार्याबद्दल पारितोषिके, ०५ पुरस्कार (२२०५ १४३६) या योजनेतंर्गत उपलब्ध तरतूदीतून भागविता यावा.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत-स्थळावर उपलब्ध करण्यात येत असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२००३१६१०३४४२१९२३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित केलेला आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

Vilas Ramrao Thorat

Digitally signed by Vilas Ramrao Thorat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tourism And Cultural Affairs Dept, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e6cc4d20348a52de465c7c34a61591bbe69b747ae11457103a0cfb9a57fc6ce6, serialNumber=cb03c92b399cc89310bf1378c184d97a4b7b9b98e926ea8e71dd7bc9cb273631, cn=Vilas Ramrao Thorat
Date: 2020.03.16 12:49:35 +05'30'

**( विलास रा. थोरात )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मंत्री, सांस्कृतिक कार्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
२. मा. राज्यमंत्री, सांस्कृतिक कार्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
३. सचिव (सांस्कृतिक कार्य), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
४. उप सचिव (सांस्कृतिक कार्य), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
५. संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, मुंबई
६. सर्व अशासकीय सदस्य (संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालयामार्फत)
७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
८. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
९. महालेखापाल (लेखा परीक्षा) -१ महाराष्ट्र, मुंबई
१०. महालेखापाल (लेखा परीक्षा) - १ महाराष्ट्र, नागपूर
११. महालेखापाल (लेखा अनुज्ञेयता) -२ महाराष्ट्र, मुंबई
१२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२ महाराष्ट्र, नागपूर
१३. अवर सचिव, अर्थसंकल्प शाखा, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग
१४. निवड नस्ती, सां.का.४